**राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानाखाली भंडारा जिल्हा दूध संघ म., भंडारा या संघास निधी उपलब्ध करुन देणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राकृवि २०१३ /प्र.क्र. ७७ /पदुम-८**

मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२

तारीख: ७ फेब्रुवारी, २०१५

वाचा :१) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ८.८.२०१३

२) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २९.१०.२०१३,दिनांक ३.१२.२०१३ व दि.२६.९.२०१४

३) आयुक्त, कृषि यांचे जा.क्र.नि/प्र.क्र.५२/राकृवियो कक्ष/निधी वा./१४-१५/६०/२०१५, दि.२२.१.२०१५ चे पत्र

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत दूध व्यवसाय करणा-या सहकारी संस्थांचे बळकटिकरण/ विस्तारीकरण / आधुनिकीकरण करण्याकरीता केंद्र शासनाच्या राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानांतर्गत भंडारा जिल्हा दूध संघ म., भंडारा या संघास सफेद लोणी प्रकल्पासह दूध भुकटी प्रकल्प उभारणीसाठी रु. ६९३.०० लक्ष रक्कमेचा प्रकल्प मंजूर करण्यात आलेला आहे.सदर प्रकल्प राबविण्याकरीता प्रकल्प किंमतीच्या ७५ टक्के राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान हिस्सा रु.५१९.७५ लक्ष इतका असून २५ टक्के संघाचा हिस्सा म्हणून रु. १७३.२५ लक्ष इतका निश्चित करण्यात आलेला आहे. त्यापैकी राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान हिस्स्यापोटी सन २०१३-१४ व सन २०१४-१५ मध्ये अद्यापपर्यंत अनुक्रमे रु.२७४.०० लक्ष व रु.२००.०० लक्ष असा एकूण रु.४७४.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. उपरोक्त संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानाचा निधी आयुक्त कृषि यांचेकडून उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदर निधीमधून भंडारा जिल्हा दूध संघ म., भंडारा संघास राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानांतर्गत उर्वरित रु.४५.७५ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

शासन या निर्णयान्वये भंडारा जिल्हा दूध संघ म., भंडारा संघास राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान हिस्स्यापोटी, सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीतून रु.४५.७५ लक्ष इतका निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर वितरीत निधी अनुषंगाने संघ हिस्स्यापोटीचा २५ टक्के म्हणजेच रु.१५.२५ लक्ष इतका निधी दूध संघाने गुंतविणे आवश्यक राहील.

२. सदर योजनेअंतर्गत वितरीत करण्यात आलेला निधी विनियोग केला असल्याबाबतचे विहित नमुन्यातील अंतिम लेखापरीक्षित उपयोगिता प्रमाणपत्र व प्रकल्पाचे अंतिम पूर्णत्व प्रमाणपत्र संबंधित जिल्हयाच्या दुग्धव्यवसाय विकास अधिकारी / प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास यांनी संघाकडून प्राप्त करुन घ्यावे व ते शासनास

सादर करावे. तसेच प्रकल्पाच्या प्रगतीबाबत आढावा घेण्यासाठी त्रैमासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल छायांकितप्रतीसह आयुक्त दुग्धव्यवसाय विकास व शासनास सादर करावा.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी खर्च करण्याकरीता अटी व शर्ती हया दिनांक ८.८.२०१३ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०७१६३३४११००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2015.02.07 16:44:17 +05'30'

**(श.मा.साठे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री (कृषि ), मा.मंत्री (पदुम), मा.राज्यमंत्री (पदुम)यांचे खाजगी सचिव
४) अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
५) मा.सचिव (पदुम) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६) आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
७) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई-४०० ०१८
९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म., पश्चिम द्रुतगती मार्ग, गोरेगाव, मुंबई
१०) प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, नागपूर विभाग,नागपूर
११) विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) नागपूर विभाग, नागपूर
१२) जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, भंडारा
१३) जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, भंडारा
१४) जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, भंडारा
१५) महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर
१६) कक्ष अधिकारी, राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मुंबई
१७) व्यवस्थापकीय संचालक, भंडारा जिल्हा दूध संघ मर्यादित, भंडारा
१८) निवड नस्ती